**भाषा संचालनालयातील लिपिक-टंकलेखक या मंजूर पदांचे कामकाज पाहण्यासाठी बाह्यस्त्रोताद्वारे भरलेल्या उमेदवारांवरील खर्च भागविण्यासाठी मंजुरी.**

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

शासन निर्णय, क्रमांक भासंनि-२०१७/प्र.क्र.६३/आस्था-२,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४.०८.२०१८

**संदर्भ-** १) शासन निर्णय, क्र. भासंस-२०१७/प्र.क्र.१६/आस्था-२, दि. २०.०२.२०१७
२) भाषा संचालक यांचे पत्र क्र. नियुक्ती-२०१६/१८५८/७६२/चौदा, दि. २४.०४.२०१७

**शासन निर्णय :**

भाषा संचालनालयातील लिपिक-टंकलेखक संवर्गातील रिक्त असलेली ५ पदे भरण्यासाठी संदर्भ १ अन्वये शासन मान्यता देण्यात आली आहे. सदर पदे भरण्याकरिता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे मागणीपत्र पाठविण्याकरिता सामान्य प्रशासन विभागाकडे विनंती करण्यात आली आहे. या दरम्यान भाषा संचालनालयातील कामकाज सुस्थितीत सुरु ठेवण्याकरिता आयोगाकडून उमेदवार प्राप्त होईपर्यंतच्या काळात सदर पदाकडून अपेक्षित असलेले कामकाज हाताळण्याकरिता तातडीची उपाययोजना म्हणून २ पदांवर बाह्यस्त्रोताद्वारे उमेदवार नियुक्त करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. भाषा संचालकांनी उमेदवाराच्या उपलब्धतेसाठी बाह्ययंत्रणेची निवड विहित पद्धतीने तसेच मानधनाची रक्कम प्रचलित धोरणानुसार विहित मर्यादेत निश्चित करावी. सदरची पदे भरण्यास शासन मान्यता प्राप्त झाल्यानंतर उमेदवार प्रत्यक्ष उपलब्ध होईपर्यंतच्या कालावधीतील उमेदवारांच्या मानधनावरील खर्चास या आदेशाद्वारे मान्यता देण्यात येत आहे. यापोटी होणारा खर्च "२०५२ सचिवालय-सर्वसाधारण सेवा, ०९०, सचिवालय (००) (०२) भाषा संचालक (अनिवार्य), १३ कार्यालयीन खर्च" याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

प्रस्तुत निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग- ४ मधील अनुक्रमांक ११ नुसार प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार व वित्त विभागाच्या क्र. विवि/शिकाना/१३८, दि.०७.०७.२०१८ च्या अनौपचारिक संदर्भानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२४१२४५५०६२३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

M. P. Kudtarkar

Digitally signed by M. P. Kudtarkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Marathi Bhasha, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=52bcc5e18003505c69802475fe37220a367d934681b77434d33db31221536f5f, cn=M. P. Kudtarkar
Date: 2018.08.24 15:59:08 +05'30'

(मं. प. कुडतरकर)
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. महालेखापाल-१ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सह सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व अवर सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अधिदान व लेखाधिकारी (भाषा संचालनालयामार्फत), मुंबई.
७. कक्ष अधिकारी, भाषा-२/अर्थसंकल्प, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती.